प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेकरिता अनुसूचित प्रवर्गाच्या विमा हप्त्याकरीता विमा कंपनीस अदा करावयाच्या फरकाची रक्कम सन २०२४-२५ या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून निधीवितरण करणेबाबत.
(लेखाशिर्ष २२१०जी८८८)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र. ३९/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २०ऑगस्ट, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४
२) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.प्रजयो-२०२४/प्र.क्र.८४/आरोग्य-६

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेअंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१, नागरी आरोग्य सेवा-विषमचिकत्सा, ७८९, अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०४) प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (कार्यक्रम) राज्य हिस्सा ४०टक्के लेखाशिर्ष २२१०जी८८८, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) खाली रु.४०,००,००,०००/- इतका निधी अर्थसंकल्पीत आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२५.०७.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. या अनुषंगाने सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ च्या नस्तीवरील प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०४) प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (कार्यक्रम) राज्य हिस्सा ४०टक्के लेखाशिर्ष २२१०जी८८८, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या अंतर्गत अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांकरीता माहे जुलै ते सप्टेंबर २०२४ या त्रैमासिक कालावधीतील विमा हप्त्याच्या फरकाचे प्रदान विमा कंपनीस करण्यासाठी रु. १८,५२,६७,८१२/- (अक्षरी रुपये अठरा कोटी बावन्न लाख सदुसष्ट हजार आठशे बारा फक्त) इतका निधी सार्वजनिक आरोग्य विभागास वितरीत करण्यासाठी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी

उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२५.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२५.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ६८६/२०२४/ व्यय-१४ दि.३१.७.२०२४ यास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२१११४९१३४५२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

MADHURI RAMESHRAO DESHMUKH

Digitally signed by MADHURI RAMESHRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=b2ebfb3236cc858f1bfa78f3de6498d4fcfce5d96dfebef6e55e5ffee43058f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=819CF6BD582283F10DDE4E19D8E7882D9CAB87DE4E1382FE0566D47572F14290, cn=MADHURI RAMESHRAO DESHMUKH
Date: 2024.08.21 12:03:56 +05'30'

**( माधुरी देशमुख )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व जिल्हाधिकारी
४) महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-६), मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग